**शैक्षणिक वर्ष २००९-१०**
**नवीन महाविद्यालयांना मंजूरी**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
आदेश क्रमांक:एनजीसी २००९/ (१५२/०९)/ मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै, २००९

पहावे : १) शासन निर्णय क्र. एनजीसी २००९/ (३३/०९)/ मशि ३, दिनांक १८ फेब्रुवारी २००९
२) अध्यक्ष, टास्क फोर्स तथा संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र.एनजीसी/०९-१०/नवि महा. अतु/ मान्यता/मवि-२-३,११६९ दि.२८मे, २००९
३) संचालक, उच्च शिक्षण, म.रा. पुणे यांचे पत्र क्र. उशिसं/२००९/कोर्ट केस / मवि-२-३/२११४, दिनांक ६.७.२००९.

## आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (४) नुसार राज्यातील विद्यापीठांकडून नवीन महाविद्यालयांचे प्रस्ताव शासनाकडे परवानगीसाठी प्राप्त झाले आहेत. विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची शासन निर्णय क्र. एनजीसी २००९/ (३३/०९)/ मशि ३, दिनांक १८ फेब्रुवारी २००९ अन्वये नियुक्त केलेल्या कार्यबलगटाद्वारे तपासणी करुन घेतली आहे. विद्यापीठाच्या व कार्यबलगटाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (५) अन्वये प्राप्त अधिकारानुसार मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने खालील नवीन महाविद्यालयांना सन २००९-१० या शैक्षणिक वर्षापासून परिच्छेद २ व ३ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन **कायम विना अनुदान तत्वावर** शासनाची परवानगी देण्यात येत आहे:-

| अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | प्रस्तावित महाविद्यालयाचे नांव व ठिकाण | विद्याशाखेचे महाविद्यालय |
|---|---|---|---|
| संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती | | | |
| १ | कपिलेश्वर बहुउद्देशीय संस्था, बहादा, ता. वरुड, जिल्हा अमरावती | स्व. डॉ. माधवी पाटील (भेंडे) इन्स्टिटयूट ऑफ सायन्स ॲण्ड रिसर्च, तिवसा, जि. अमरावती | विज्ञान |
| राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर | | | |
| २ | श्री. साई शिक्षण संस्था, चिमुर, जि. चंद्रपूर | चिमूर, जिल्हा चंद्रपूर | कला व विज्ञान (महिला महाविद्यालय) |

| डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | | | |
|---|---|---|---|
| ३ | बळीराम नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद | अडूळ, ता. पैठण, जिल्हा औरंगाबाद | कला, वाणिज्य, विज्ञान |

२. **अटी व शर्ती** :

(१) ज्या संस्थांना नवीन महाविद्यालय मंजूर करण्यात आले आहे, त्या संस्थांनी ते भविष्यात कोणत्याही अनुदानाची मागणी करणार नाही असे हमीपत्र त्यांच्या विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, यांचेकडे सादर करावे.

(२) संबंधित विभागीय सहसंचालकांचे वरील अ.क्र. १ मध्ये नमूद केलेले हमीपत्र सादर केल्याविषयीचे पत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांनी संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

(३) महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नये.

(४) विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग महाविद्यालयाने नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात.

(५) महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ च्या कलम ८२(५) मधील तरतूदीनुसार सदर मान्यता शैक्षणिक वर्ष २००९-१० पासून देण्यात येत आहे.

३ विद्यापीठाचे संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी विद्यापीठांनी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन करुन परवानगी बाबत खात्री करुन घ्यावी. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि.गो. चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
(१) सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे
(२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
(३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
(४) सर्व संबंधित संस्था
(५) निवड नस्ती मशि- ४